**राष्ट्रीय फलोत्पादन अभियांनातंर्गत राबविण्यात आलेल्या आदर्श व्यवस्थापन पध्दत पॅकेजच्या प्रलंबित अनुदानाकरीता राज्य हिश्श्याचा १५% निधी सन २०१०-११ मध्ये वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र राफअ २०११/प्र.क्र. ५५/९अे,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक २९ मार्च, २०११**

**वाचा :- १)** महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक-एमएसएचएमपीबी/बीबीडी/३००/१०,दि.२९/१/२०११
२) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक ३३-४१/२०१०- हॉर्ट, दि. ८ मार्च,२०११
३) केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्रमांक १८-७८/२००९/एनएचएम, दि. १६ मार्च,२०११.
४) महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मराफवऔवमं/बीबीडी/रा.हि./अ.मा./८३६, दि.१५ मार्च,२०११.
५) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक:संकीर्ण -१००६/प्र.क्र.१३१/कोषा.प्रशासन-५,दि. १५/५/२००७

**प्रस्तावना**

डाळींबावरील तेल्या रोग निर्मुलनाकरीता सन २००७-०८ मध्ये राबविलेल्या कार्यक्रमास सन २००८-०९ च्या सुधारीत आदर्श व्यवस्थापन पध्दतीच्या पॅकेजनुसार फरक देणे आणि सन २००८-०९ व २००९-१० मध्ये राबविलेल्या कार्यक्रमातील शिल्लक उर्वरित कार्यक्रमाकरीता मान्यता देण्यास केंद्र शासनाकडे संदर्भाधीन पत्र क्र. १ अन्वये केंद्र हिस्सा रु.४६६५.५७ लक्ष व राज्य हिस्सा रु.२७५३.३४ लक्ष असा एकूण रु.७४१८.९१ लक्ष कार्यक्रमाचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदरच्या प्रस्तावास केंद्र शासनाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये मान्यता देवून केंद्र हिश्श्याच्या रु.४६६६.०० लक्ष एवढया रकमेचा कार्यक्रम सन २०१०-११ च्या सुधारीत वार्षिक कृति आराखडयात दर्शविला आहे. त्याचप्रमाणे या कार्यक्रमाकरीता संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने राफअच्या ८५:१५ या तत्त्वानुसार त्यांच्या ८५% हिश्श्याचा रु.३९६६.०० लक्ष निधी उपलब्ध करुन दिला असून मंडळाच्या खात्यात जमा आहे. या केंद्र हिश्श्याच्या अपरोक्ष १५% राज्य हिस्सा म्हणून रु.७००.०० लक्ष इतका निधी सन २०१०-११ मध्ये राफअ करीता मंजूर असलेल्या तरतुदीतून उपलब्ध करुन देण्याची विनंती संदर्भाधीन पत्रान्वये करण्यात आली आहे.

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय फलोत्पादन अभियान अंतर्गत १५ टक्के राज्य हिश्यापोटी रु.२७००.०० लाखाची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत सन २००१०-११ मध्ये केंद्रिय हिश्श्यापोटी केंद्र शासनाने आतापर्यत रु.८६४८.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन दिला असून त्या अपरोक्ष राज्य हिश्श्यापोटी रु.१५२६.१२ लक्ष उपलब्ध करुन देण्यात आले आहेत. आता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन पत्र क्र ३ अन्वये त्यांच्या ८५% हिश्श्यापोटी उपलब्ध करुन

दिलेल्या रु.३९६६.०० लाख इतक्या निधीच्या अपरोक्ष १५% राज्य हिस्सा म्हणून रु.७००.०० लक्ष एवढी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

डाळींबावरील तेल्या रोग निर्मुलनाकरीता सन २००७-०८ मध्ये राबविलेल्या कार्यक्रमास सन २००८-०९ च्या सुधारीत आदर्श व्यवस्थापन पध्दतीच्या पॅकेजनुसार फरक देणे आणि सन २००८-०९ मध्ये राबविलेल्या कार्यक्रमातील शिल्लक उर्वरित कार्यक्रमाकरीता राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत सन २०१०-११ मध्ये केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार व उपलब्ध करुन दिलेल्या रु.३९६६.०० लाख इतक्या निधीच्या अपरोक्ष १५% राज्य हिश्यापोटी रु.७००.०० लक्ष (रुपये सातशे लक्ष फक्त ) एवढी रक्कम वितरीत करण्यास राज्य शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** राष्ट्रीय फलोत्पादन अभियानंतर्गत राबविण्यात आलेल्या डाळींबावरील तेल्या रोग निर्मुलनाकरीता केंद्र शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार खर्च करण्यात यावा. या योजनेवर होणारा खर्च मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**३.** डाळींबावरील तेलकट डाग रोगाच्या नियंत्रणासाठी राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या अपरोक्ष राज्य शासनाच्या १५% हिश्श्याची रु.७००.०० लाख (रुपये सातशे लक्ष फक्त ) एवढी रक्कम खालील मंजूर लेखाशीर्षातील सन २०१०-२०११ च्या तरतूदींतून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी - ३
२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) रोपमळे
(०३ )(३४ ) राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (राज्य योजना) (२४०१ ४५०७)

३३- अर्थसहाय्य

**४.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्याकडे एक रकमी सुपूर्द करण्यासाठी **सहाय्यक संचालक लेखा, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**५.** वरील प्रमाणे मंजूर केलेला निधी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरण पत्राप्रमाणे वित्त विभागाने विकसीत केलेल्या " संगणकीय अर्थसंकल्प विवरण प्रणाली " मध्ये शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ५ येथील शासन निर्णयाची काटेकोरपणे अमंलबजावणी होईल यांची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

**६.** वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सदर शासन निर्णय त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६४/११/ व्यय-१, दिनांक, दि.२९ मार्च, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सकेतांक ( २०११०३२९१६१५५२००१) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ.बा.गोसावी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, मुंबई
आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (१० प्रती)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( १० प्रती )
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षाअधिकारी, मुंबई
संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. /वित्त विभाग (व्यय-१ ) अर्थसंकल्प -३,१२,
सह सचिव/सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषी व फलो. विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.लोक आयुक्त / मा. उपलोकआयुक्त , नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२.
पुणे महानगर नियोजन समिती, विभागीय आयुक्तालय आवार निवाडा शाखा, पहिला मजला,पुणे-१.
निवड नस्ती